**उद्‌भवाचे अंतर मुख्य साठवण टाकीपासून ३ किमी पेक्षा जास्त होत असेल, किंवा १०० मीटर पेक्षा जास्त उंचीवर पाणी न्यावे लागणार आहे. अशा योजनांमधील ज्या उपंगावर लोकवर्गणीतून सूट देण्यात येईल. अशा उपांगांवरील खर्च योजनेचा दरडोई खर्च काढताना विचारात न घेणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक ग्रापाधो-१११९/प्र.क्र.०५८(अ)/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १६ मे, २०११**

**वाचा:-**५) शा.नि.पापुवस्ववि. क्र. ग्रापायो १२०८/ प्र.क्र.९६/पापु-०७, दि.१८ ऑगस्ट, २००८.
६) शा.नि.पापुवस्ववि. क्र. ग्रापाधो १११०/ प्र.क्र.१४१ /पापु-०७, दि.०१ जुलै, २०१०.
७) शा.शु.प.पापुवस्ववि. क्र. ग्रापाधो १११०/ प्र.क्र.१४१/पापु-०७, दि.१२ नोव्हेंबर,२०१०

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ अन्वये, उद्‌भवाचे अंतर मुख्य साठवण टाकीपासून ३ कि.मी.पेक्षा जास्त असल्यास किंवा १०० मीटर पेक्षा जास्त उंचीवर पाणी न्यावे लागणार असल्यास, अशा योजनांमधील पाईप लाईन, ब्रेक प्रेशर टँक, पंपीग मशिनरी इत्यादी कामांसाठी येणाऱ्या खर्चावर लोकवर्गणी माफ करण्यासाठी शासनस्तरावर समिती गठीत करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ व ३ अन्वये यासंदर्भात पुरेशी स्पष्टता आणण्यात आलेली आहे. अशा योजनांच्या ३ कि.मी. पुढील अथवा १०० मीटर पेक्षा जास्त उंचावरील पाईप लाईन, ब्रेक प्रेशर टँक, पंपीग मशिनरी इत्यादी वाढीव कामांमुळे योजनांच्या किंमतीमध्ये वाढ होऊन त्या दरडोई खर्चाच्या निकषामध्ये बसत नाहीत. त्यामुळे या योजनांना शासनस्तरावरून मान्यता घेणे भाग पडते. परिणामतः योजनांची कामे सुरु करण्यास विलंब होतो. परिणामी त्या योजना विहित कालावधीत पूर्ण करणे शक्य होत नाही. ही बाब विचारात घेऊन, ज्या योजनांचे उद्‌भव ३ कि.मी. पेक्षा जास्त अंतरावर अथवा १०० मीटर पेक्षा जास्त उंचावर असतील अशा योजनांच्या बाबतीत ज्या उपांगांवर लोकवर्गणीत सूट देण्यात येते अशा कामांसाठी येणारा खर्च योजनेचा दरडोई खर्च

ठरविण्यासाठी विचारात घेण्यात येऊ नये, जेणेकरून योजनांचा दरडोई खर्च विहित खर्चाच्या निकषांमध्ये बसू शकेल, अशा निष्कर्षाप्रत शासन आले आहे. या संदर्भात सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

उपरोक्त परिस्थिती विचारात घेऊन, संदर्भ क्र. १, २ व ३ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार ज्या योजनांमधील उद्‌भवाचे अंतर मुख्य साठवण टाकीपासून ३ किमी पेक्षा जास्त होत असल्याने किंवा १०० मीटर पेक्षा जास्त उंचीवर पाणी न्यावे लागल्याने, अशा योजनांमधील ज्या उपांगांवार लोकवर्गणीत सूट देण्यात आली असेल सूट देण्यात येणार असेल त्या उपांगांसाठी येणारा खर्च दरडोई खर्च ठरविण्यासाठी विचारात घेण्यात येऊ नये. याबाबतची पडताळणी शासन स्तरावरून करण्यात यावी.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०५१६१३३१४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(मालिनी शंकर)**

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

*प्रत,*

*मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,*
*मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव*
*विभागीय आयुक्त (सर्व)*
*सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई*
*संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद*
*सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,*
*सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद*
*महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*

*महालेखापाल, महाराष्ट्र - २,  नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई*
*उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर*
*सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती*
*नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई*
*वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,*
*ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई*
*मंत्रालयातील इतर सर्व विभाग,*
*पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने*
*निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७*